**पोलीस शिपाई भरती**
**माजी सैनिकांना शारीरिक पात्रतेत सवलती देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक-आरसीटी-०३०९/प्र.क्र.६९२/पोल-५अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ९ सप्टेंबर २०११

वाचा : (१) शासन परिपत्रक, गृह विभाग क्रमांक-एमआयएस-२००८/प्र.क्र.५१८/पोल-५अ, दिनांक २६ ऑगस्ट २००८
(२) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक-आरसीटी-०३०९/प्र.क्र.६९२/पोल-५अ, दिनांक ७ एप्रिल २०११
(३) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक-आरसीटी-०३११/प्र.क्र.२२८/पोल-५अ, दिनांक १६ जून २०११
(४) संचालक, माजी सैनिक विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक-१९०३३/ पोलीस भरती/सैकवि-१५/३८६४, दिनांक २३ ऑगस्ट २०११

**प्रस्तावना :**

राज्यातील पोलीस शिपाई पदाच्या भरती प्रक्रियेत माजी सैनिकांसाठी शारीरिक पात्रतेमध्ये सैन्य दल, आंध्रप्रदेश व मध्यप्रदेश राज्यांकडून देण्यात येणारी सवलत महाराष्ट्र राज्यामध्ये लागू करण्याचा व त्यानुसार महाराष्ट्र पोलीस शिपाई (सेवाप्रवेश) नियम २००६ मधील कलम-४(१)(अ) मध्ये नमूद केलेल्या शारीरिक पात्रतेत माजी सैनिकांना पोलीस भरतीमध्ये खालीलप्रमाणे सवलत देण्याचा दिनांक ७ एप्रिल २०११ च्या शासन निर्णयान्वये घेतला होता.

| अ.क्र. | शारीरिक चाचणी परीक्षा | माजी सैनिकांना सवलत |
|---|---|---|
| १ | १०० मीटर धावणे | + ३.५ सेकंद |
| २ | ८०० मीटर धावणे | + ०.५ सेकंद |
| ३ | पूल अप्स | ९ पूल अप्स |
| ४ | गोळा फेक | - १.५ मीटर |
| ५ | लांब उडी | - १ मीटर |

आता दिनांक १६ जून २०११ च्या शासन आदेशान्वये महाराष्ट्र पोलीस शिपाई (सेवाप्रवेश) नियम २०११ प्रसिद्ध करण्यात आले असून, त्यातील कलम-४(१)(अ) मध्ये पुरुष उमेदवारांना ५ कि.मी.धावणे, १०० मीटर धावणे, गोळा फेक, लांब उडी व १० पूल अप्स ही चाचणी परीक्षा द्यावी लागणार आहे. या शारीरिक पात्रतेत माजी सैनिकांना सवलत देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

कृ.मा.प.....

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र पोलीस शिपाई (सेवाप्रवेश) नियम २०११ मधील कलम-४(१)(अ) मध्ये पुरुष उमेदवारांना ८०० मीटर धावणे ऐवजी ५ कि.मी.धावणे ही नवीन तरतूद करण्यात आली आहे. या तरतुदीबाबत संचालक, माजी सैनिक विभाग, पुणे यांनी दिनांक २३ ऑगस्ट २०११ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार माजी सैनिकांना खालीलप्रमाणे सवलत देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

| अ.क्र. | शारीरिक चाचणी परीक्षा | माजी सैनिकांना सवलत |
|---|---|---|
| १ | ५ कि.मी. धावणे | + ७ मिनिटे |

वरील सवलत धावण्यासाठीच्या प्रत्येक टप्प्यावर असेल.

२. १०० मीटर धावणे, गोळा फेक, लांब उडी व १० पूल अप्स या शारीरिक चाचणी परीक्षेकरिता माजी सैनिकांना दिनांक ७ एप्रिल २०११ च्या शासन निणर्यान्वये यापूर्वी दिलेली सवलत यापुढेही चालू राहिल. मात्र मैदानी चाचणी, लेखी परीक्षा यामधील ५ टक्के गुणांची सवलत देण्यात येणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( म.र.शेळके )
शासनाचे अवर सचिव, गृह विभाग.

प्रति,

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
४) संचालक, माजी सैनिक विभाग, पुणे.
५) सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक
६) सर्व पोलीस आयुक्त
७) सर्व पोलीस अधिक्षक
८) सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट
९) सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण विद्यालये
१०) आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई
११) कक्ष अधिकारी (१६-अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती / पोल-५अ